# मासा आज्ञा देतो



रादुगा प्रकाशन
मॉस्को

* रशियन लोककथा

# मासा आज्ञा देतो

पुन्हा कथन: *

म. बूलातोव

एका खेड्यात तीन भाऊ रहात होते: दोघे हुशार होते, तिसरा येमेल्यूश्का मूर्ख होता. एकदा थोरल्या भावांनी दूरच्या शहरातील जत्रेला जाण्याची तयारी केली. ते येमेल्याला म्हणतात:

"येमेल्या तू आळशीपणा करू नको, चुलाण्यावर निजून राहू नको. आमच्या बायकांचं सर्व काही ऐक. तर मग आम्ही भेटवस्तू तुझ्यासाठी आणू: नवे उंच बूट, कफ्तान आणि नवी लाल टोपी."

"ठीक आहे," येमेल्या उत्तरतो, "ऐकेन मी त्यांचं!"

भावांनी निरोप घेतला व ते निघून गेले.

थोड्या वेळानंतर त्यांच्या बायका म्हणतात:

"येमेल्यूश्का, जरा नदीवर जा आणि पाणी आण बघू–आमच्यापाशी पाणी नाही."

येमेल्या चुलाण्यावरून त्यांना म्हणाला:

"माझी इच्छा नाही!"

"इच्छा नाही म्हणजे? आम्हाला मदत करण्याचं कुणी वचन दिलं?"

"बरं बरं!"

येमेल्या चुलाण्यावरून खाली उतरला. त्याने बूट चढविले, कोट घातला, कमरेला कुऱ्हाड खोचली, बादल्या घेऊन काठीला लटकवल्या आणि काठी खांद्यावर टाकली.

तो टेकाडावरून खाली उतरला, नदीपर्यंत गेला. तेथे बर्फ थिजले होते, फोडून काढणे आवश्यक होते. त्याला एक मोठा पाईक मासा दिसला. येमेल्याने पटकन माशाची शेपूट पकडली व बर्फाच्या भोकातून माशाला वर खेचले.

तेवढ्यात मासा त्याला उद्देशून माणसाच्या आवाजात म्हणाला :

"अरे मूर्खा कशाला मला पकडलंस ?"

"कशाला म्हणजे ? आता तुला भावजयींपाशी नेतो, त्या माशाचं सार शिजवतील. मला खाऊ घालतील."

मासा येमेल्याची विनवणी करू लागला :

"मला ठार मारू नको, येमेल्यूश्का, नदीत सोड. ह्याबद्दल तुला मी श्रीमंत करतो !"

"माझी इच्छा नाही," येमेल्या उत्तरतो, "तुझ्या त्या श्रीमंतांविना मी जगेन."

"तर मग असं करतो, सर्व काही तुझ्या शब्दाबरहुकूम होईल, तुझ्या शब्दांची अंमलबजावणी होईल. फक्त तू म्हण : मासा आज्ञा देतो, माझी इच्छा आहे."

"हे ठीक झालं !" येमेल्या म्हणतो.





त्याने माशाला बर्फाच्या भोकात टाकले आणि म्हटले :

"मासा आज्ञा देतो, माझी इच्छा आहे, बादल्यांनो, आपोआप पाण्यानं भरा आणि स्वत: घरी जा."

तावडतोब बादल्या पाण्याने आपोआप भरल्या आणि घराच्या दिशेने त्या टेकडी चढू लागल्या. त्या बदकांप्रमाणे डुलत निघाल्या. येमेल्या हसत त्यांच्या पाठी चालू लागला.

हे शेजाऱ्यांनी अंगणांमधून, घरांमधून बघितले, ते धावत आले.

"बघा हो बघा," म्हणाले, "येमेल्या कशा मजा करतोय! त्याच्या बादल्या स्वत:च चालतात, पाण्याचा एकही थेंब हिंदकळत नाही!"

गावांच्या बायकांनी येमेल्याला बघितले, त्या आपापसात कुजबुजू लागल्या :

"हा कुठला मूर्ख! बघा किती धूर्त! बादल्यांना त्यानं चालायला लावलं!"



बादल्या घरापाशी पोहोचल्या, तेव्हा त्या पायऱ्या चढून गेल्या आणि बाकावर चढल्या, त्यांच्यातून पाण्याचा एकही थेंब सांडला नाही.

येमेल्याने कोट अंगातून काढला, बूट पायात घातले व तो पुन्हा चुलाण्यावर चढला आणि म्हणाला :

"ए वहिनींनो! चुलाणा थंड झाला, ऊब देत नाही!"

"त्याला तापवलं नाही, म्हणून ऊब मिळत नाही. रानात जा, लाकडं फोड, तेव्हा चुलाणा तापवू."

"माझी इच्छा नाही!"

"पुन्हा तुला इच्छा नाही? तर मग भेटवस्तू तू बघणार नाहीस आणि थंड चुलाण्यावर बसावं लागेल!"

काही इलाज नव्हता. येमेल्या चुलाण्यावरून खाली उतरला, कपडे घालून तो अंगणात गेला.



रानात जाऊन लाकडे फोडण्याची तयारी करू लागला. घसरगाडी ओढून घेऊन आला. तिच्यात त्याने कुऱ्हाड टाकली, करवत टाकली, लांब दोरी टाकली आणि स्वतः बसला.

"ए वहिनींनो! फाटक जास्त रुंद उघडा!" तो ओरडला. "मी रानात जातोय!"

"काय म्हणतोस?" भावजयी म्हणाल्या. "तुझं डोकं थाऱ्यावर आहे ना? घोडा जुंपला नाही आणि एव्हाना निघालास घोडा जुंपायला. आम्ही तुला मदत करतो!"

येमेल्या उत्तरला:



"कशाला घोड्याला पळवायचं? मला त्याची दया येते! मी घोड्याशिवाय जातो! फाटक उघडा!"

भावजयी चकित झाल्या. त्यांनी फाटक उघडले. इथे येमेल्या पुटपुटला:

"मासा आज्ञा देतो, माझी इच्छा आहे, घसरगाडी धाव स्वतः रानात!"

घसरगाडी धावू लागली, खेड्यामधून धावू लागली. जणू येमेल्या तिला दांडे जुंपायचा विसरला, अशी ती भरधाव धावू लागली. तिच्या धावांखाली बर्फ चुरचुरत होते.

त्या दिवशी खेड्यात लोकांची गर्दी जमली होती. उत्सव साजरा चालला होता. घसरगाडीमागून, तिच्या दोन्ही बाजूंना, तिच्याखालून लोक धावाधाव करू लागले. घोड्याविना घसरगाडी कशी धावते हे बघायची लोकांची इच्छा होती. अनेकांनी बर्फात पाय रुतविले. येमेल्याला पकडायला, मागे परतवायला लोक धावले. त्यांनी त्याला गाठले नाही.





घसरगाडी रानात धावत आली व थांबली. येमेल्या घसरगाडीतून खाली उतरला. त्याने चौफेर नजर टाकली व तो म्हणाला:

"मासा आज्ञा देतो, माझी इच्छा आहे, करवती, तू झाडांना काप, सर्वात सुकलेल्या लाकडांना निवड, कुऱ्हाडी, तू लाकडं फोड. लाकडांनो, तुम्ही स्वतः कुऱ्हाडीखाली या आणि घसरगाडीतून रचून रहा, दोरी बांधून घ्या!"

त्याच्या सर्व शब्दांची अंमलबजावणी झाली. करवतीने झाडांना कापले, कुऱ्हाड खाड खाड लाकडे फोडत होती. लाकडे स्वतः घसरगाडीकडे धावू लागली, स्वतः रचून राहिली. दोरीने घट्ट घट्ट त्यांनी बांधून घेतले. आता खेड्यात परत जाणे आवश्यक होते!

येमेल्याने जू बांधले, वाटेत लोक जखमी होऊ नयेत अशी त्याने काळजी घेतली आणि तो ओरडला.

"मासा आज्ञा देतो, माझी इच्छा आहे, धाव घसरगाडी, घरी जा!"

घसरगाडी धावली, फक्त बर्फ उधळला.

येमेल्याची वाट बघत लोक थांबले होते – कुणी चिमटे, काठ्या घेतल्या, कोणी दोऱ्या घेतल्या. येमेल्याला अद्दल घडवायची त्यांची इच्छा होती. रानात जाताना सर्वांना त्याने घाबरवल्याबद्दल, जखमी केल्याबद्दल!

ज्या क्षणी तो नजरेच्या टप्प्यात आला,



त्या क्षणी लोक दोऱ्या घेऊन, आकडे घेऊन, येमेल्याला थांबवायला पुढे धावले.

"पकडा त्याला!" लोक ओरडले. "थांबवा! पकडा त्याला!"

पण कुठून त्याला पकडणार, धरणार? घसरगाडी धावतेय, तिच्यापाठी बर्फ उधळत होते.

घसरगाडी घराच्या फाटकामधून घुसली व थांबली. लाकडे आपोआप उतरू लागली, काही ओंडके अंगणात आपोआप रचून उभे झाले. बाकीचे पायऱ्या चढून घरात गेले, त्यांनी चुलाण्यावर उड्या मारल्या. प्रत्येकाला स्वत:ची योग्य जागा माहीत होती. कुऱ्हाड व करवत आपोआप घरात गेल्या. बाकाखाली जाऊन पडल्या.

भावजयी खूप घाबरल्या. त्यांना काहीही सुचेना. घाबरून त्या धावपळू लागल्या, लपू लागल्या – कुणी टेबलाखाली, कुणी फळीवर.

"आम्ही तुझ्याबद्दल भावापाशी तक्रार करणार!" त्या ओरडल्या.

येमेल्या त्यांना खदखदा हसला.

"अशा कशा घाबरट तुम्ही! लौकर बाहेर या बघू! मला कोबीचं सार खाऊ घाला: रानात मी पुरता गोठलोय!"



येमेल्या जोवर कोबीचे सार भुरकत होता आणि चुलाण्यावर हाडे शेकत होता, तोवर लोक झारपाशी तक्रार करायला धावले: "खेड्यात मूर्ख येमेल्या असा एक जण आहे, तो घोड्यांविना घसरगाडीतून फिरतो, सर्वांना घाबरवतो, लोकांना पाडतो, त्यांना बर्फात पुरतो."

झारला कुतूहल वाटले – हा कोण येमेल्या? झारने स्वत:च्या सरदाराला पाठविले.



झारचा सरदार मोठा लवाजमा घेऊन आला. त्याने येमेल्याची झोपडी शोधली. झोपडीत घुसून सरदार धमकावणीच्या आवाजात ओरडला:

"इथं तो मूर्ख येमेल्या कुठं? त्याला इकडं हजर करा!"

भावजयी घाबरल्या, त्या चुलाण्यामागे लपल्या. एकही शब्द उच्चारायची त्यांची हिंमत नव्हती. एकटा येमेल्या घाबरला नव्हता:

"इथं आहे मी," तो म्हणाला, "चुलाण्यावर बसून तुझ्याकडं बघतोय. तुला काय पाहिजे?"

"कपडे घाल अंगात मूर्खा! बूट चढव मूर्खा! तुला थेट झारपाशी घेऊन जातो मूर्खा!"

"मला इच्छा नाही!"

"अरे वा! वर तोंड करून असं बोलतोस!"

झारचा सरदार येमेल्यावर धावून गेला व त्याने त्याच्या थोबाडीत मारले.

"पकडा," तो ओरडला, "त्याला बळजबरीनं!"

येमेल्याला हे आवडले नाही. तो पुटपुटला:

"मासा आज्ञा देतो, माझी इच्छा आहे, चल रे सोटचा, आगंतुक पाहुण्याचा समाचार घे! चल ग झाडू, त्याला झाडून काढ!"

मग सोटा उठला, झाडू ताडदिशी उठली, त्यांनी झारच्या सरदाराला झोडून काढले आणि झाडून काढले.



झारचा सरदार स्वतःच्या नोकरांसकट झोपडीबाहेर पळाला. त्याच्या टाचा पळताना चमकत होत्या. सोटा व झाडू आपले काम बंद करेनात: सरदारावर त्यांनी दया केली नाही. त्याच्या पाठीवर आणि खांद्यांवर त्यांनी गोंजारले. असे त्यांनी सरदाराला थेट झारच्या राजवाड्यापर्यंत पोहोचविले.

सरदार झारसमोर लंगडत, सरपटत आला. तो म्हणाला :

"हे असं झालं! त्याला बळजबरीनं पकडता येत नाही, त्यापेक्षा धूर्तपणाचा वापर करावा..."

झारने येमेल्याकडे दुसरा दूत पाठवला : हा दूत दर्जाने कमी होता, बुद्धीने मोठा होता. दूताने मधाची बिस्कीटे, दाणे घेतले व तो येमेल्याकडे निघाला.

तो खेड्यात आला. त्याने येमेल्याच्या भावजयींना शोधले. त्यांना तो प्रश्न करू लागला :

"तुमच्या येमेल्याला काय काय आवडतं किंवा आवडत नाही?"

भावजयी म्हणाल्या :

"त्याच्याशी उर्मट बोललं म्हणजे त्याला आवडत नाही, त्याला अदबीनं विनंती केली म्हणजे आवडतं."

झारचा दूत झोपडीत शिरला. तो चुलाण्यापाशी गेला. खूप वाकून मुजरा करीत तो म्हणाला :

"नमस्ते, येमेल्यान इवानिच! मधाची बिस्कीटं खा, दाणे खा, मिठाई खा. झारची आपली भेट घ्यायची इच्छा आहे!"

"चुलाण्यावरून खाली उतरायची माझी इच्छा नाही!" येमेल्या उत्तरला.

"चला, येमेल्यान इवानिच! जर आला नाहीत, तर झार मला जिवंत ठेवणार नाही, तुमच्याखातर माझं मुंडकं उडवील!"

येमेल्याला झारच्या दूताची दया आली.

"ठीक आहे, तुझ्या मर्जीप्रमाणं घडेल, चलतो मी." येमेल्या म्हणाला, "फक्त तू माझ्या आधी जा, रस्ता स्वच्छ कर, मी तुझ्या पाठोपाठ येईन."





झारचा दूत भावजयींना हळूच विचारतो:

"हा मूर्ख मला फसवणार तर नाही ना?"

"नाही फसवणार," भावजयी उत्तरल्या, "तो बोलेल तसा वागेल असा आहे!"

झारचा दूत निघून गेला. येमेल्याने चुलाण्यावर आळोखेपिळोखे दिले व तो म्हणाला:

"उबदार चुलाण्यावरून खाली उतरायची इच्छा नाही! अंगणात बर्फाचं वादळ घोंघावतंय. माझा कोट जुना आहे, सगळीकडं भोकं पडलीत, ठिगळं खूप लागलीत. चल रे चुलाण्या, मासा आज्ञा देतो, माझी इच्छा आहे, झारपाशी चल!"

चुलाणा फिरला, करकरला, वळला आणि घरातून निघाला. तो मैदानामधून गेला, कुरणांमधून, खेड्यांमधून गेला, झारच्या दूताने त्याला गाठले.



चुलाणा थेट सरळ गेला, त्याच्या चिमणीतून धूर निघत होता. येमेल्या गाणी गाऊ लागला. सारी राजधानी चकित झाली, लोक बोटे दाखवू लागले, बघू लागले, कुत्री भुंकू लागली, घोडे खिंकाळू लागले, कोंबडे आरवू लागले.

सेवक झारपाशी धावले.

"महाराज, लौकर बाहेर या! मूर्ख येमेल्या तुमच्यापाशी येतोय!"

झार स्वतःच्या मुलांसह प्रवेशमंडपात आला, त्याच्याबरोबर सरदार व इतर मानकरी होते. तो येमेल्याला विचारू लागला:

"घोडी जुंपल्याविना घसरगाडीमधून तू कोणत्या हक्कावरून जातोस? माझ्या प्रजाजनांना तू बर्फात का पाडतोस?" येमेल्या त्याला उत्तरला:

"माझा काय ह्यात दोष? लोक बाजूला झाले नाहीत, ते स्वतःच घसरगाडीखाली आले. जर तुम्ही वाटेत आलात, तर तुम्हालाही आडवं केलं असतं!"

झार चिडला. त्याने हुकूम दिला: येमेल्याला चुलाण्यावरून खाली खेचावे, त्याला चाबकाने झोडावे व तुरुंगात टाकावे. तेथे न थांबणे अधिक इष्ट, असे येमेल्याच्या ध्यानात आले. तो हळूच पुटपुटला:

"मासा आज्ञा देतो, माझी इच्छा आहे, चुलाण्या परत चल आणि झारच्या मुली, माझ्या प्रेमात घट्ट पड, माझ्याशी लग्न करण्याची मागणी कर!"



चुलाणा परत गेला. झार पुन्हा ओरडला: "धरा त्याला, चुलाण्यावरून खाली खेचा, दोऱ्यांनी बांधा." पण कुणालाही असे करणे जमेना. अशा रीतीने येमेल्या आला, ना त्याने अभिवादन केले, निघून गेला – ना त्याने निरोप घेतला.

चुलाणा आला, करकरला, कोपऱ्यात उभा झाला. जणू काही आख्खे युग तेथे उभा राहिला, जणू कुठेही गेला नाही, बाहेर गेला नाही.

झारच्या राजवाड्यात किंचाळ्यांचा गोंधळ माजला व अश्रूंचा पूर वाहिला. झारची मुलगी बापामागे लकडा लावू लागली, झारला शांतता लाभू देईना:

"कशाला येमेल्याला धमकी घातलीत? कशाला येमेल्याला घाबरवलंत? मी त्याच्याविना जगू शकत नाही. त्याच्याशी मला लग्न करायचं!"

झार ओरडला. त्याने मुठी आपटल्या, पाय दणादणा आदळले, तो काहीही करू शकेना: झारची मुलगी दिवस आणि रात्र रडत होती. तिचा डोळ्याला डोळा लागेना. ना ती खाईना, ना झोपेना. ती खंगली. काही उपाय चालेना. झारने येमेल्याला घेऊन आणण्याचा हुकूम दिला.

"फक्त, चुलाण्यावरून आणू नका," झार म्हणाला. "त्याला चुलाण्यावरून खाली खेचू नका, घसरगाडीतून आणा. इथं आपण त्याचं मन वळवू!"



झारचा धूर्त दूत खेड्याकडे दौडत गेला. चतुर शब्दांनी त्याने येमेल्याला फसविले. येमेल्याला झोपेचे औषध पाजले. दोऱ्यांनी येमेल्याला गच्च गच्च बांधून टाकले, मग घसरगाडीत त्याला टाकले. आणि शक्य तो वेगाने दौडत तो परतला.

त्याने येमेल्याला झारपाशी आणले. झारने एक मोठ्ठे पिंप तयार करवून घेतले. सेवकांनी येमेल्याला धरले व त्याला पिंपात बसविले. झारच्या मुलीने हे पाहिले. ती धावत आली व दोन्ही हातांनी पिंपाला विळखा घालून ओरडली, तिला पिंपापासून अलग करता येणे अशक्य ठरले.

"जेथे येमेल्या, तेथे मी असेन!" ती ओरडू लागली.

झारचा संतापापायी सारा विवेक नष्ट झाला. आपल्या मुलीलासुद्धा पिंपात बसवा, असा त्याने हुकूम दिला:

"जर अशा मूर्खावर तिचं प्रेम जडतं, तर त्याच्याबरोबरच तिचं आयुष्य वाया जाऊ दे!"

झारच्या शब्दांनुसार करण्यात आले. पिंपाला भक्कम लोखंडी कड्या ठोकण्यात आल्या. पिंपाला डांबर माखण्यात आले व समुद्रात फेकण्यात आले.

पिंपात झारच्या मुलीने येमेल्याच्या अंगाभोवती दोऱ्या सोडल्या व त्याला जागे केले:





"येमेल्या असा झोपतोस काय! जागा हो! आपण पिंपात बसलोय. महासागरात आपल्याला फेकून देण्यात आलंय, खायला, प्यायला नाही, उपासमारीनं मरू!"

येमेल्या तिला म्हणतो:

"मला झोपायची इच्छा आहे!"

"माझीही तशी इच्छा आहे! ही झोपायची वेळ नाही आता! पिंपाला किनाऱ्यापर्यंत गडगडत घेऊन जा. तू खूप हुशार आहेस, तुला सर्व काही करणं शक्य आहे!"

"ठीक आहे, तुझ्या इच्छेप्रमाणं होऊं दे!" येमेल्या म्हणतो. "मासा आज्ञा देतो, माझी इच्छा आहे, पिंपा हिरव्या कुरणावर गडगडत जा, सोनेरी वाळूवर फूट!"

त्याच्या तोंडून हे शब्द उमटताच, पिंप एका बेटावर गडगडत गेले व ते फुटले. ती दोघे हिरव्या कुरणावर व सोनेरी वाळूवर बाहेर पडली.

झारच्या मुलीने सभोवार नजर फेकली व ती म्हणते:

"येमेल्या, आता कसं आपण जगू? जरा बघ, इथं ना वस्ती, ना शहर, आपल्याला निदान एक छोटी लाकडी झोपडी पाहिजे..."

"आपल्याला छोटी झोपडीही नसेल," येमेल्या उत्तरतो. "मासा आज्ञा देतो, माझी इच्छा आहे, राजवाड्या उभा रहा, झारच्या राजवाड्यापेक्षा जास्त चांगला!"



त्याने एवढे म्हणताच राजवाडा उभा तयार. जणू जमिनीतून उगवला होता. तो सात खांबांवर उभा होता. त्याला रंग अद्भुत सुंदर होता: त्याची छपरे चांदीची होती. त्याचे घुमट सोनेरी होते. त्याच्या सर्व बाजूंना प्रवेशमंडप उभे होते. राजवाड्याभोवती बागा व तळी होती, ग्रीष्म वाटिका निरनिराळ्या होत्या. बागांमध्ये बुलबुल पक्षी गात होते. तळ्यांमध्ये बदके व हंस पोहत होते.



येमेल्या व झारची मुलगी राजवाड्यात गेली. आतील दालने आणखी अद्भुत: छपरांवर लाल सूर्य चमकत होता. सूर्य मावळताच चंद्राची कोर स्पष्ट दिसत होती, काही तारे विखुरले होते...

ती दोघे बेटावरच्या राजवाड्यात राहू लागली. त्यांना हव्या त्या गोष्टी सर्व मिळत



होत्या, फक्त जगणे कंटाळवाणे होते: आसपास जिवंत माणसे नव्हती.

"निदान घरच्या माणसांना भेटलं तर चालेल," झारच्या मुलगीने विनंती केली.

"ठीक आहे!" येमेल्या म्हणतो. "मासा आज्ञा देतो, माझी इच्छा आहे, समुद्रावर पूल उभा राहो! त्या पुलावरून आमच्याकडं भाऊ त्यांच्या बायकांबरोबर येऊं देत!"



त्याने एवढे शब्द उच्चारताच, समुद्रावर पूल उभा झाला. त्याचे कठडे सोनेरी होते. त्याच्या खांबावर रत्न-माणके जडवली होती, ती खूप चमकत होती! पुलावरून घोड्याची गाडी येऊ लागली, गाडीत येमेल्याचे भाऊ व त्यांच्या बायका होत्या. सर्वांच्या अंगात नवे सदरे होते, नवे अंगरखे होते, फुललेल्या फुलांप्रमाणे दिसत होते. त्या सर्वांनी येमेल्याला मिठ्या मारल्या व त्याची चुंबने घेतली.

म्हणाले: "अरे मूर्खा, आम्ही तुझा सगळीकडं शोध घेतला, रानात, दलदलीत फिरलो, आणि तू इथं सापडलास!"

तेवढयात अचानक तोफांचा गडगडाट ऐकू आला. बेटापाशी एक गलबत उभे झाले. गलबतावर झार त्याच्या दरबाऱ्यांसह होता. येमेल्याने विचारले:

"गलबतवाल्यांनो, कुठं निघालात?"

"आम्ही अनेक दिवस समुद्रावर प्रवास करतोय, एका पिंपाला शोधतोय."

"कशाला तुम्हाला पिंप पाहिजे?"

"कशाला म्हणजे?" झारने विचारले, "त्या पिंपात माझी मुलगी होती आणि मूर्ख येमेल्या. माझी बुद्धी फिरली, त्यांना नष्ट करायची माझी इच्छा होती."

येमेल्या म्हणतो:

"जरा माझ्याकडं नीट पहा बघू: मीच तुझ्याकडं चुलाण्यावरून आलो होतो ना?"

झारने बघितले, तो अगदी गर्भगळित झाला. येमेल्याचे त्याने पाय धरले:

"माफ कर येमेल्या, माझा वध करण्याची आज्ञा करू नको..."

"ठीक आहे," येमेल्या म्हणाला. "ह्यावेळी तुला माफ करतो!"

तेवढयात झारची मुलगी राजवाडयातून बाहेर आली.

"कृपया राजवाडयात यावं आमच्यापाशी!" ती म्हणाली.

सगळे ओकच्या लाकडी टेबलापाशी बसले, नक्षी विणलेले कपडे टेबलावर अंथरले होते, सगळेजण आनंदाने खात, पीत आणि गाणी गात होते.

मी सुद्धा तेथे होतो,
मध, बीयर प्यायलो,
मिशांमधून थेंब गळाले,
पण तोंडात एकही थेंब पडला नाही!







